जल जीवन मिशन कार्यक्रमांतर्गत वाशिम जिल्ह्यातील नळ पाणी पुरवठा योजनेच्या सुधारीत अंदाजपत्रकास सुधारित प्रशासकीय मान्यता देणेबाबत...

मौ. चिवरा ता. मालेगाव जि. वाशिम

# महाराष्ट्र शासन

**पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः** WSSD-१३०४(४)/२/२०२३ (०७) WSD (WS १३)
**७ वा मजला, गोकुळदास तेजपाल रुग्णालय संकुल,**
**लोकमान्य टिळक मार्ग, मंत्रालय, मुंबई-४०० ००१**
**दिनांक: २९ ऑगस्ट, २०२३.**

वाचा :-

१) शासन निर्णय क्रमांक जजमि-२०२२/प्र.क्र.८१ /पापु-१०, दिनांक ०२ मे, २०२२
२) केंद्र शासन, जल शक्ती मंत्रालय, यांचे पत्र दि.२१.०६.२०२२ व दि.२८.०६.२०२२
३) कार्यकारी अभियंता,ग्रा.पा.पु. , जि. प. वाशिम यांचे तांत्रिक मान्यता आदेश दि. १७.०३.२०२२.
४) मुख्य कार्यकारी अधिकारी, जि. प. वाशिम यांचे प्रशासकीय मान्यता आदेश क्र. ग्रापापुवि/जाक्र/ ७९३/२०२२ दि.२२.०४.२०२२
५) पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, शा. नि. क्र. जजिमि-२०२२/प्र.क्र.४१४/पापु-१३, दि. ०३.०६.२०२२.
६) पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, शा. नि. क्र. जजिमि-२०२२/प्र.क्र.४४२/पापु-१३, दि. ३०.०६.२०२२
७) पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, शा. नि. क्र. जजिमि-२०२२/प्र.क्र.४४५/पापु-१३,दि. ३०.०६.२०२२.
८) पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, शा. नि. क्र. जजिमि-२०२२/प्र.क्र.१६६६/पापु-१३,दि. १८.११.२०२२.
९) पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, शा. नि. क्र. जजिमि-२०२२/प्र.क्र.१७६७/पापु-१३,दि. २५.११.२०२२.
१०) पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, शा. नि. क्र. जजिमि-२०२२/प्र.क्र.१७७०/पापु-१३,दि. २५.११.२०२२.
११) पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, शा. नि. क्र. जजिमि-२०२२/प्र.क्र.१७७१/पापु-१३,दि. २५.११.२०२२.
१२) मुख्य कार्यकारी अधिकारी, जि. प. वाशिम यांचे पत्र क्र. ग्रापापुवि/निविदा/३४७/२०२३, दि.२७.०२.२०२३.

प्रस्तावना :-

जलजीवन मिशन कार्यक्रमातंर्गत संदर्भ क्र. १२ येथील पत्रांन्वये मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, वाशिम यांनी वाशिम जिल्ह्यातील योजनांच्या नळ पाणी पुरवठा योजनांच्या जादा दरांच्या निविदा स्वीकृतीस कार्योत्तर मान्यता देण्याच्या व त्यानुषंगाने योजनांच्या आराखड्यास व अंदाजपत्रकास सुधारित प्रशासकीय मान्यता प्रस्ताव शासनास सादर केलेले आहेत. वाशिम जिल्ह्यातील सदर योजनांच्या आराखड्यास व अंदाजपत्रकास संदर्भ क्र. ०४ येथील आदेशान्वये मुख्य कार्यकारी अधिकारी, जि. प. वाशिम यांचे स्तरावर प्रशासकीय मान्यता प्रदान केली असून, सदर योजनांच्या जादा दरांच्या निविदा स्वीकृतीमुळे झालेली वाढ विचारात घेता, कार्यकारी अभियंता,

ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद, वाशिम यांनी सदर योजनांना सुधारित तांत्रिक मान्यता दिलेली आहे.

त्यानुषंगाने वाशिम जिल्ह्यातील मौ. चिवरा ता. मालेगाव जि. वाशिम नळ पाणी पुरवठा योजनांच्या आराखड्यास व अंदाजपत्रकास सुधारीत प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

वाशिम जिल्ह्यातील खालील तक्त्यात नमूद केलेल्या नळ पाणी पुरवठा योजनांच्या अंदाजपत्रकास व आराखड्यास खालील अटींच्या अधीन राहून सुधारित प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

| अ. क्र. | योजनेचे नाव | मुळ अंदाजपत्रकीय रक्कम (रुपयामध्ये) | सुधारीत प्रशासकीय मान्यता द्यावयाची रक्कम (रुपयामध्ये) | मूळ प्रशासकीय रकमेत होणारी वाढ (टक्केवारी) |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| १. | **मौ. चिवरा ता. मालेगाव जि. वाशिम** | **१४४५०७८१** | **१५८१७०६४** | **०९.४५%** |

**अटी**

१. सोबतच्या परिशिष्ट-अ नमुद सुधारित किंमतीत उर्वरित सर्व कामे विहित मुदतीत पूर्ण करावीत.

२. या योजनेस सहमती दिलेल्या मूळ प्रशासकीय मान्यतेच्या तसेच सुधारीत तांत्रिक मान्यता देतांना नमुद केलेल्या अटी व शर्तीचे काटेकोरपणे पालन करण्यात यावे.

३. ही योजना पूर्ण झाल्यावर ती संबंधित ग्रामपंचायतीच्या ताब्यात देण्यात यावी. संबंधित कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद, वाशिम यांच्याकडून योजना प्रत्यक्षात पूर्ण झाली आहे, या आशयाची सूचना मिळाल्याच्या दिनांकापासून एक महिन्याच्या आत योजना ताब्यात घेण्यास संबंधीत ग्रामपंचायत/जिल्हा परिषद जबाबदार राहील. योजना प्रत्यक्षात पूर्ण झाल्यावर लगेच संबंधित कार्यकारी अभियंता, जिल्हा परिषद व संबंधित ग्रामपंचायतचे अधिकारी यांनी योजनेची संयुक्तपणे पाहणी आयोजित करावी आणि अशा पाहणीत कोणतेही दोष आढळून आल्यास योजना ताब्यात देण्यापूर्वी ते सुधारण्यात यावेत.

४. ही योजना राबविणे, त्याचे परिरक्षण, दुरुस्त्या (विशेष दुरुस्त्या धरुन) या साठी दरवर्षी येणारा आवर्ती खर्च भागविण्यासाठी,योजनेतील घसारा किंवा यंत्रसामुग्री नुतनीकरणासाठी संबंधित ग्रामपंचायतीस/जिल्हा परिषदेस शासनाकडून कोणतीही मदत मिळणार नाही.

५. सदर योजना पुर्ण झाल्यावर स्थानिक स्वराज्य संस्थेने ( संबधित ग्रामपंचायत/ जिल्हा परिषद) योजना हंस्तातरित करुन घेणे बंधनकारक राहील. तसेच योजनेचे लेखे बंद करण्यात यावेत.

६. सन २०१३ मधील CAG च्या अहवालानुसार राज्यातील २१% पाणी पुरवठा योजना या देखाभाल दुरुस्ती अभावी, वीज देयक न भरल्यामुळे ( Poor maintenance/nonpayment of electricity of bills) बंद पडल्या असल्याचे दिसून येते. यास्तव सदर योजना आर्थिकदृष्ट्या सक्षम राहण्याच्या दृष्टीने पाणीपट्टी दरामध्ये आवश्यकतेनुसार वाढ करण्याची जबाबदारी संबधित ग्रामपंचायत/जिल्हा परिषद यांची राहील.

७. हगणदारीबाबतच्या प्रचलित धोरणानुसार कार्यवाही करण्यात यावी.

८. प्रस्तुत योजना कोणत्याही परिस्थितीत पुनर्सुधारीत केली जाणार नाही याची जबाबदारी जिल्हा परिषदेची राहील.

९. या योजनेस मूळ प्रशासकीय मान्यतेच्या तसेच सुधारीत तांत्रिक मान्यता देतांना नमुद केलेल्या अटी व शर्तीचे काटेकोरपणे पालन करण्यात यावे.

१०. सदरची निविदा प्रक्रिया योग्यप्रकारे पार पाडण्यात आली आहे, याची खातरजमा जिल्हा परिषद स्तरावर करण्यात यावी.

११. जल जीवन मिशन अंतर्गत प्रशासकीय खर्च अनुज्ञेय नसल्याने जर सदर योजनेच्या सुधारित अंदाजपत्रकामध्ये ४ टक्के प्रशासकीय खर्च घेण्यात आलेला असेल, तर तो वगळण्यात यावा.

१२. केंद्र व राज्य शासनामार्फत वस्तु व सेवा कराबाबत वेळोवेळी निर्गमित केलेल्या अधिसूचना व शासननिर्णयातील तरतुदीस अनुसरुन तसेच केंद्र शासनाच्या मार्गदर्शक सूचनांना अनुज्ञेय वस्तु व सेवा कराच्या रकमेची अदायगी करण्यात यावी.

०२. या योजनेच्या किंमतीतील वाढीव खर्च रुपये १३,६६,२८३/- ( अक्षरी रुपये तेरा लक्ष सहासष्ट हजार दोनशे त्र्याऐंशी फक्त) हा जल जीवन मिशन कार्यक्रमांतर्गत वेळोवेळी निर्गमित केलेल्या मार्गदर्शक सूचनांप्रमाणे मागणी क्रमांक वाय-०२, २२१५ पाणी पुरवठा व स्वच्छता, १०२ ग्रामीण पाणी पुरवठा कार्यक्रम,जल जिवन मिशन कार्यक्रम (केंद्र हिस्सा) ३१ सहाय्यक अनुदाने (वेतनेत्तर) ( २२१५ ९७९१) (२२१५ ए०८८) (२२१५ ९८५३), जल जीवन मिशन कार्यक्रम (राज्य हिस्सा) (२२१५ २०७१) (२२१५ ए०९७) (२२१५ ए०६१) या लेखाशिर्षाखालील मंजुर अनुदानातून भागविण्यात यावा व त्याखाली अंतिमत: खर्ची टाकण्यात यावा.

**०३.** वाशिम जिल्ह्यातील प्रस्तुत योजनांना सुधारीत प्रशासकीय मान्यता ही वित्त विभागाच्या दिनांक १७.०४.२०१५ च्या क्रमांक विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम, भाग-२ या शासन निर्णयातील भाग पहिला, उपविभाग-३ मधील अ.क्र. ६ (सहा) परिच्छेद क्र. २७ (अ) अनुसार विभागास प्रदान करण्यात आलेल्या प्राधिकारानुसार देण्यात येत आहेत.

०४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०८२८१२२८२१९९२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

RANI DEELIPRAO DEOKATE

Digitally signed by RANI DEELIPRAO DEOKATE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WATER SUPPLY AND SANITATION DEPARTMENT, 2.5.4.20=b0869a90562f87b9afb32e69166c729b50fd795952e7aeb9091b613d5a868aa7, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=BBD64806F9A7A26899A43E3A95A0566B762C44B895D6316615D2932D87DEFEEE, cn=RANI DEELIPRAO DEOKATE
Date: 2023.08.29 17:30:27 +05'30'

**(राणी देवकत्ते)**
**कक्ष अधिकारी,महाराष्ट्र शासन.**

**प्रत,**

१) मा. मंत्री, पाणी पुरवठा व स्वच्छता यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२) मा. राज्यमंत्री, पाणी पुरवठा व स्वच्छता यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई..
३) मा. विरोधी पक्षनेता, महाराष्ट्र विधानसभा/ विधान परिषद.
४) मा. विधानमंडळ सदस्य (सर्व)
५) सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई.
६) जिल्हाधिकारी, वाशिम .
७) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, वाशिम .
८) महालेखापाल, लेखा परिक्षा, महाराष्ट्र-२, नागपूर.
९) महालेखापाल, लेखापरीक्षा, महाराष्ट्र १, मुंबई
१०) अभियान संचालक, राज्य पाणी व स्वच्छता मिशन, बेलापूर, नवी मुंबई.
११) मुख्य अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, प्रादेशिक विभाग, नागपूर.
१२) अधीक्षक अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, वाशिम .
१३) संचालक (वित्त), महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, सिडको भवन, बेलापूर,नवी मुंबई.
१४) आयुक्त, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, पुणे.
१५) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, वाशिम .
१६) वरिष्ठ भुवैज्ञानिक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, पुणे
१७) कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद, वाशिम .
१८) अपर मुख्य सचिव, नियोजन विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
१९) अपर मुख्य सचिव, वित्त विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
२०) प्रधान सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
२१) मु.अ. तथा वि.का.अ. पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग,यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
२२) कार्यासने (पापु-०४ व २०), पा. पु. व स्व.वि., मंत्रालय,मुंबई-३२.
२३) निवड नस्ती कार्यासन पापु-१३.